**विजाभज आश्रमशाळेतील बी.पी.एड. अर्हताधारक शिक्षकांना प्रशिक्षित प्राथमिक शिक्षकाची वेतनश्रेणी लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१५ /प्र.क्र.१०/विजाभज-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक - २१ ऑक्टोबर,२०१५

**प्रस्तावना** :-

मा. उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपिठात दाखल केलेल्या याचिका क्र ६९६४/२०१३ मधील याचिकाकर्त्यांची मूळ नियुक्तीच्या वेळी शैक्षणिक अर्हता बी.ए., बी.पी.एड अशी होती. त्यामुळे संबंधित समाज कल्याण अधिकारी यांनी त्यांच्या पदास अप्रशिक्षित प्राथमिक शिक्षक म्हणून मान्यता दिली. तद्नंतर याचिकाकर्त्यानी प्राथमिक शिक्षक पदासाठी आवश्यक असलेली डी.एड ही शैक्षणिक अर्हता प्राप्त केली. ही शैक्षणिक अर्हता प्राप्त केल्याच्या वर्षापासून याचिककर्त्यांना प्रशिक्षित प्राथमिक शिक्षकाची वेतनश्रेणी देण्यात आलेली आहे.याचिकाकर्त्यानी सुमारे १५ ते १६ वर्षानंतर मा.उच्च न्यायालयात याचिका क्र. ६९६४/२०१३ दाखल करुन मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून प्रशिक्षित प्राथमिक शिक्षकाची वेतनश्रेणी देण्याची मागणी केली.

सदर याचिकेच्या अनुषंगाने याचिकाकर्त्यांची मागणी मा. उच्च न्यायालयाने ग्राह्य धरुन याचिकाकर्त्यांना मूळ नियुक्तीच्या दिनांकास प्रशिक्षित समजून त्यांना प्रशिक्षित प्राथमिक शिक्षकाची वेतनश्रेणी लागू करण्याचे निर्देश दिनांक १०.१.२०१४ रोजी दिले. सदर न्यायालयीन प्रकरणी मा.उच्च न्यायालयाचा निकाल शासन धोरणाशी विसंगत आहे. तथापि, संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अपिल याचिका विहित मुदतीत दाखल केली नाही. याचिकाकर्त्यानी मा.उच्च न्यायालयात अवमान याचिका क्र.२७६/२०१५ दाखल केलेली आहे. सदरहू अवमान याचिकेच्या सुनावणीच्या वेळी मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.६९६४/२०१३ मध्ये दिनांक १०.१.२०१४ रोजी दिलेल्या निकालाची अंमलबजावणी करुन केलेल्या अंमलबजावणीबाबत पुढील सुनावणीच्या वेळी न्यायालयास कळविण्याचे निर्देश संबंधित सहाय्यक आयुक्त व प्रादेशिक उपायुक्त यांना दिलेले आहेत.यास्तव,मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशास अनुसरून कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

मा.उच्च न्यायालयाने याचिका क्रमांक ६९६४/२०१३ मध्ये दिनांक १० जानेवारी,२०१४ रोजी दिलेल्या निकालाच्या अनुषंगाने ज्या प्राथमिक शिक्षकाची मूळ नियुक्तीच्या दिनांकास शैक्षणिक अर्हता बी.ए. व बी.पी.एड अशी होती व नंतर ज्यांनी डी.एड ही शैक्षणिक अर्हता धारण केलेली आहे आणि त्यांना सदरहू अर्हता धारण केल्यानंतर प्रशिक्षित प्राथमिक शिक्षकाची वेतनश्रेणी लागू करण्यात आलेली आहे, अशा सदरहू अवमान याचिकेतील बी.पी.एड व नंतर डी.एड अर्हता धारण करणाऱ्या शिक्षकानांच

त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून प्रशिक्षित प्राथमिक शिक्षकाची वेतनश्रेणी लागू करण्यास खास बाब म्हणून तात्पुरत्या स्वरुपात खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) सदरहू प्रकरणी मा.उच्च न्यायलयात पुनर्विलोकन याचिका किंवा मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका दाखल करण्याचे प्रस्तावित आहे.त्यामध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२) याचिकाकर्त्यांना त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून प्रशिक्षित प्राथमिक शिक्षकाची वेतनश्रेणी लागू करण्यात यावी,तथापि त्यांना प्रशिक्षित प्राथमिक शिक्षकाच्या कालावधीच्या वेतनाची थकबाकी देता येणार नाही.

३) सदर मंजुरी सदरहू याचिकेमधील याचिकाकर्त्यांपुरतीच देण्यात येत आहे. तसेच,सदरहू मंजूरी पूर्वोदाहरण म्हणून अन्य प्रकरणी लागू राहणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२११७४८३८१८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

Dinesh
Ramchandra
Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2015.11.09 16:26:36 +05'30'

**( दि.रा.डिंगळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
५) मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) सर्व मंत्रालयीन विभाग,
७) महालेखापाल- महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल- महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
९) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) सर्व जिल्हाधिकारी,
१२) संचालक, नगर पालिका प्रशासन, वरळी, मुंबई

१३) सर्व महानगरपालिका
१४) संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) संचालक, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इमाव व विशेष मागास प्रवर्ग संचालक, पुणे
१६) सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१७) सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
१८) सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
१९) सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ जिल्हा परिषद
२०) संचालक, माहिती व जनसंपर्क संचानालय, मुंबई
२१) ग्रंथपाल, वाचनालय, मंत्रालय, मुंबई
२२) सर्व राजकीय पक्षांचे कार्यालय
२३) निवडनस्ती- विजाभज-२